**सामाईक दरसूची समितीच्या रचनेतील बदलाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- दरसूची-२३१०/(५४/१०)/लपा-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक ३/६/२०१०**

संदर्भ- शासन परिपत्रक (इंग्रजी) क्र.एस.आर.एस.१०८०/११७६६९/(५३/८०)/भाग-IV-MONI, दिनांक २८ जुलै, १९८१

शासनाने शा.नि.क्र. निविदा ११०९/(६३१/२००९)/मोप्र-१, दिनांक ३०.११.२००९ च्या निर्णयान्वये प्रकल्पाच्या कामाशी संबंधीत निविदांमध्ये समानता असण्याचे दृष्टीने स्थापन केलेल्या अभ्यास गटाने शासनास सादर केलेल्या अहवालात जलसंपदा विभागाची सामाईक दरसूची तयार करण्यासाठी प्रचलित असलेल्या सध्याच्या समिती रचनेत बदल सूचविला आहे व क्षेत्रिय मुख्य अभियंत्यांचा समावेश करुन मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यासाठी शिफारस केली आहे. ही शिफारस शासनाने स्विकारलेली आहे. त्या अनुषंगाने खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २) मुख्य अभियंता, कोंकण प्रदेश, जलसंपदा विभाग,मुंबई | सदस्य |
| ३) मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे | सदस्य |
| ४) मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग अमरावती | सदस्य |
| ५) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक (लाक्षेविप्रा), औरंगाबाद | सदस्य |
| ६) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | सदस्य |
| ७) मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग,नाशिक | सदस्य |
| ८) मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे | सदस्य |
| ९) मुख्य अभियंता, (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक | सदस्य |
| १०) अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे | सदस्य |
| ११) उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई | सदस्य सचिव |

सदर स्थायी समिती ही पूर्ण राज्यासाठी प्रत्येक वर्षाच्या ३० जुन पर्यंत सामाईक दरसूची तयार करेल. व शासनास मान्यतेसाठी सादर करेल. सामाईक दरसूची मध्ये समाविष्ट बाबींचे दर व त्या दरांचे दर पृथ्थःकरणाचे पुनर्विलोकन करणे तसेच ते सुधारित करणे व सदर दर शासन मान्यतेने जलसंपदा विभागासाठी उपलब्ध करुन देणे इ. जबाबदारी समितीची राहील.

सदर शासन परिपत्रक शासनाचे वेबसाईट २०१००६०३१५०६३७००१ वर ठेवण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(च.आ.बिराजदार)
मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव

प्रत,

महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
सर्व मुख्य अभियंता, व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
सर्व क्षेत्रिय मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
सर्व क्षेत्रिय अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व क्षेत्रिय कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
लपा-२ कार्यासन संग्रहार्थ.